**महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न असलेल्या संस्थेतील कर्मचारी /अधिकाऱ्यांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या अंशदानाच्या रकमा परत करण्याबाबतची कार्यपध्दती.**

# महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: मपवि २०१६/प्र.क्र.२३/म्हापसू,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३१ ऑगस्ट, २०१७

<u>संदर्भ</u> : १) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अंनियो-१००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१ ऑक्टोबर, २००५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अंनियो-१००७/प्र.क्र.१८/सेवा-४, दिनांक ७ जुलै, २००७.
३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक मपवि २०१०/प्र.क्र.१४४/पदुम-१ (अ), दिनांक ०७ जानेवारी, २०११.
४) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक कृविआ/१११० (प्र.क्र. १००)/६अे, दिनांक ०५ मार्च २०११.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दिनांक १८ ऑगस्ट, २००९.
६) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अंनियो-१००९/प्र.क्र.१/सेवा-४, दिनांक १२ नोव्हेंबर, २०१०.

**<u>प्रस्तावना :-</u>**

शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अंनियो-१००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१ ऑक्टोंबर, २००५ अन्वये राज्य शासनाने दिनांक ०१ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांसाठी नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना (Defined Contribution Pension Scheme) अंमलात आणली आहे. ही योजना संदर्भाधीन क्रमांक २ येथील या विभागाच्या दिनांक ०७/०१/२०११ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न असलेल्या संस्थेतील कर्मचारी /अधिकाऱ्यांना लागू करण्यात आली आहे. शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक अंनियो-१००७/१८/सेवा-४, दिनांक ७/७/२००७ अन्वये सदर योजनेचे नियम व अंमलबजावणी करण्याची पध्दत विहीत करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद २४ नुसार ज्या कर्मचाऱ्यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू केली आहे अशा कर्मचाऱ्याचा सेवेत असताना अकाली मृत्यू झाल्यास, कर्मचाऱ्याने नियत वयोमानापूर्वी (यथास्थिती, ५८/६० वर्षे) सेवात्याग केल्यास, सेवान्त लाभ देण्यासंबंधी तसेच दिनांक ०१ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत कार्यरत असलेल्या व दिनांक ०१ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर राज्यातील दुसऱ्या निवृत्तीवेतनार्ह सेवेत रुजू झालेल्या ज्या कर्मचाऱ्यांची नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन

योजनेखाली वर्गणी कपात करण्यात आली असून वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १८ ऑगस्ट, २००९ च्या परिपत्रकानुसार अशा कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम-१९८२ च्या तरतूदी लागू ठरल्या आहेत, अशा सर्व प्रकरणात अंमलात आणावयाची कार्यपध्दती वित्त विभागाने संदर्भाधीन दिनांक १२ नोव्हेंबर, २०१० च्या शासन निर्णयान्वये स्वतंत्रपणे विहीत केली आहे.

२. त्यानंतर या विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ५ मार्च, २०११ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील कृषि विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न अनुदानीत महाविद्यालयातील अधिकारी / कर्मचाऱ्यांसाठी नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या अंमलबजावणी करीताची कार्यपध्दती विहीत केली आहे. तथापि, सदर शासन निर्णयान्वये परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या अंशदानाच्या रकमा परत करण्याची कार्यपध्दती विहीत करण्यात आलेली नाही. त्या अनुषंगाने चारही कृषि विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न अनुदानित सर्व कृषि शिक्षण व संशोधन संस्थांच्या सेवेत कार्यरत असलेल्या ज्या अधिकारी व कर्मचाऱ्यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू केली आहे, अशा कर्मचाऱ्याचा सेवेत असताना अकाली मृत्यु झाल्यास, कर्मचाऱ्याने नियत वयोमानापूर्वी (यथास्थिती, ५८/६० वर्षे) सेवात्याग केल्यास, सेवान्त लाभ देण्यासंबंधी तसेच दिनांक ०१ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत कार्यरत असलेल्या व दिनांक ०१ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर राज्यातील दुसऱ्या निवृत्तीवेतनार्ह सेवेत रुजू झालेल्या ज्या कर्मचाऱ्यांची नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेखाली वर्गणी कपात करण्यात आली असून वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १८ ऑगस्ट, २००९ च्या परिपत्रकानुसार अशा कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम-१९८२ च्या तरतूदी लागू ठरल्या आहेत, अशा सर्व प्रकरणात अंमलात आणावयाची कार्यपध्दतीची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

वरील प्रस्तावनेला अनुलक्षून शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्रमांक मपवि २०१०/ प्र.क्र.१४४ /पदुम-१ (अ) दि.०७/०१/२०११ अन्वये महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न असलेल्या संस्थेत कार्यरत असलेल्या ज्या अधिकारी व कर्मचाऱ्यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू केली आहे अशा कर्मचाऱ्यांना खालील परिस्थितीत अंशदानाच्या रकमा परत करण्याबाबत सोबत जोडलेल्या जोडपत्र-१ प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

१) कर्मचाऱ्यांचा सेवेत असताना मृत्यु झाल्यास,

२) कर्मचाऱ्याने नियत वयोमानापूर्वी (यथास्थिती, ५८/६० वर्षे) सेवात्याग केल्यास,

३) दिनांक ०१ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर राज्यातील दुसऱ्या सेवेत रुजू झालेल्या ज्या कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम,-१९८२ च्या तरतूदी लागू ठरल्या आहेत, अशा कर्मचाऱ्यांची नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेखाली वर्गणी कपात करण्यात आली असल्यास,

२. महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न असलेल्या संस्थांमधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या रकमा परत देण्याची जबाबदारी नियंत्रक यांची राहील. त्याकरीता नियंत्रक यांनी अर्थसंकल्पात प्रत्येक आर्थिक वर्षात पुढील लेखाशिर्षांतर्गत मागणी करावी.

| | |
|---|---|
| ८३४२ इतर ठेवी<br>११७ शासकीय कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्ती योजना<br>(००) शासकीय कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्ती योजना<br>(००) (०७) शासकीय कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्ती योजना -महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न असलेल्या संस्थेमधील कर्मचारी /अधिकाऱ्यांकडून जमा केलेल्या परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या अंशदानाचा परतावा.<br>(८३४२ ०१९५) | 8342 Other Deposits<br>117 Defined Contribution Pension Scheme For Government employees<br>(00) Defined Contribution Pension Scheme<br>(00) (07) Defined Contribution Pension Scheme - Refund of Contribution collected under DCPS to Officers and Employees in the Maharashtra Animal & Fishery Sciences University, Nagpur and its Affiliated Institutions<br>(8342 0195 ) |

३. या योजनेंतर्गत रकमांमधून संबंधित कर्मचाऱ्यांना / कर्मचाऱ्यांच्या वारसाला परतावा मंजूर करण्याकरीता नियंत्रक / उपराज्य अभिलेख देखभाल अभिकरण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. हा खर्च वर नमूद केलेल्या लेखाशीर्षाखालील वित्तीय वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक १४७/अर्थ २/१७, दिनांक १९/०८/२०१७ नुसार दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०८३११५०९१३२००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vikas Tulshiram Kadam

Digitally signed by Vikas Tulshiram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, cn=Vikas Tulshiram Kadam
Date: 2017.08.31 16:09:27 +05'30'

**( विकास कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे सचिव, राजभवन, मुंबई,

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

३) मा. मंत्री, कृषी यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४) मा. राज्यमंत्री, कृषी यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

५) मा. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,

६) सचिव, सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभाग (लेखा व कोषागारे), मुंबई,

७) महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, सर्व्हे नं.१३२/ब, भोसलेनगर, पुणे,

८) महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,

९) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,

१०) उप संचालक, राज्य अभिलेख देखभाल अभिकरण, मुंबई,

११) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,

१२) सह मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर,

१३) जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर,

१४) कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, फुटाला लेक रोड, नागपूर -१

१५) नियंत्रक, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, फुटाला लेक रोड, नागपूर -१

१६) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव/ अवर सचिव/कक्ष अधिकारी,

१७) वित्त विभाग (कार्यासन सेवा-४/कोषा-५), मंत्रालय, मुंबई-३२,

१८) निवड नस्ती (कार्यासन- म्हापसू).

**जोडपत्र "१"**

**महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न असलेल्या संस्थामधील जे कर्मचारी सेवेत असताना मृत झालेल्या/ नियत वयोमानापूर्वी (यथास्थिती, ५८/६० वर्षे) सेवानिवृत्ती घेतलेल्या अथवा अन्य प्रकारे शासन सेवा सोडलेल्या / दिनांक ०१/११/२००५ नंतर विद्यापीठ सेवेत नियुक्त झाल्यानंतर पुढे शासनाने पूर्वीची सेवा ग्राह्य धरुन अशा कर्मचाऱ्याला दिनांक ०१.११.२००५ पूर्वीची मानीव तारीख दिलेल्या कर्मचाऱ्यांच्या संदर्भात करावयाची कार्यवाही-**

१) **कर्मचाऱ्याच्या वारसाने / कर्मचाऱ्याने करावयाची कार्यवाही-** परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या कर्मचाऱ्याचा सेवेत असताना मृत्यु झाला तर त्या कर्मचाऱ्याने नामनिर्देशित केलेल्या व्यक्तीने किंवा जर त्या कर्मचाऱ्याने नामनिर्देशन केले नसेल तर शासनाच्या सध्याच्या भविष्य निर्वाह निधी नियमानुसार नामनिर्देशित ठरु शकणाऱ्या वारसाने त्या कर्मचाऱ्याच्या मूळ मृत्यु प्रमाणपत्रासह त्या कर्मचाऱ्याच्या खात्यावर जमा असलेली रक्कम परत मिळण्यासाठी संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांकडे यासोबत विहित नमुन्यातील (नमुना-अ) अर्ज सादर करावा. अशीच कार्यवाही सेवा समाप्त झालेल्या / पुर्वीची सेवा ग्राह्य धरलेल्या कर्मचाऱ्याने करावी.

२) **आहरण व संवितरण अधिकाऱ्याने करावयाची कार्यवाही** - महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठाच्या आहरण व संवितरण अधिकाऱ्याने कर्मचाऱ्याच्या वारसाच्या अर्जाची प्रत व मृत्यु प्रमाणपत्राची प्रत / कर्मचाऱ्याच्या अर्जाची प्रत, तसेच कर्मचारी मृत झाला/कर्मचाऱ्याची सेवा समाप्त झाली त्या वर्षाच्या / त्या आधीच्या आर्थिक वर्षाच्या नमुना आर-३ मधील लेखा विवरणाची (Statement of Accounts) प्रत यासह सोबत जोडलेल्या नमुन्यातील (नमुना-ब) अर्ज कर्मचारी शेवटी ज्या कोषागाराच्या अखत्यारीतील कार्यालयात कार्यरत असेल अशा कोषागाराला सादर करावा. अशा कोषागाराकडून सोबत जोडलेल्या नमुन्यातील (नमुना-ड) विवरणपत्र प्राप्त झाल्यानंतर आहरण व संवितरण अधिकाऱ्याने त्याची एक साक्षांकित प्रत, मृत कर्मचाऱ्यांच्या नामनिर्देशित व्यक्तीचा/कर्मचाऱ्याचा, परताव्याची मागणी करणारा मूळ अर्ज (नमुना-अ), मृत कर्मचाऱ्याच्या मृत्यु प्रमाणपत्राची मूळ प्रत आणि कर्मचारी मृत झाला / कर्मचाऱ्याची सेवा समाप्त झाली त्या वर्षाच्या / त्या वर्षाच्या आधिच्या आर्थिक वर्षाच्या नमूना आर-३ मधील लेखा विवरणाची (Statement of Accounts) प्रत, यासह आहरण व संवितरण अधिकाऱ्याने करावयाचा मृत कर्मचाऱ्याच्या वारसास / कर्मचाऱ्यास देय जमा रकमेच्या परताव्याबाबतचा विहीत नमुन्यातील (नमुना-क) विनंती अर्ज नियंत्रक, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर या कार्यालयास सादर करावा.

३) **नियंत्रकाने करावयाची कार्यवाही -** संबंधित नियंत्रक यांनी नमुना-ब मधील अर्ज आहरण व संवितरण अधिकाऱ्यांकडून प्राप्त झाल्यानंतर संबंधित कर्मचाऱ्याच्या खात्यात जमा असलेल्या वर्गणीची रक्कम त्यांच्याकडील ब्रॉडशिट व लेजर वरुन तपासून घ्यावी. अशा प्रत्येक प्रकरणी रक्कम तपासून कोषागार अधिकारी तथा उप राज्य अभिलेख देखभाल अभिकरण अधिकारी यांनी ताळमेळाच्या विहित नमुन्यातील विवरणपत्राच्या (नमुना ड) तीन प्रतींवर साक्षांकन करावे व त्याच्या दोन प्रती आहरण व संवितरण अधिकाऱ्याला द्याव्यात व एक प्रत कार्यालयाच्या नस्तीत ठेवावी.

४) **नियंत्रक / उप राज्य अभिलेख देखभाल अभिकरणाने करावयाची कार्यवाही-** आहरण व संवितरण अधिकाऱ्याच्या अर्जासोबत (नमुना-क) प्राप्त झालेल्या माहितीच्या आधारे नियंत्रक हे कार्यालय जमा रकमेचा ताळमेळ घेऊन परतावा आदेश (नमुना-ई) निर्गमित करेल. या आदेशाची एक

प्रत संबंधित कोषागार अधिकाऱ्यांना आणि दुसरी प्रत संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना पाठविण्यात यावी. तिसरी प्रत कार्यालयात जपून ठेवण्यात यावी.

त्यानंतर आहरण व संवितरण अधिकारी या आदेशाआधारे कोषागारात देयक सादर करतील. हे देयक साधी पावती (Simple Receipt) (नमुना ४५-अ) मध्ये सादर करण्यात यावे.

परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत प्रदान करण्यात येणारी परताव्याची रक्कम "८३४२ इतर ठेवी, ११७ - शासकीय कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्ती योजना, (००)- शासकीय कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्ती योजना, (००) (०७) शासकीय कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्ती योजना -महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न असलेल्या संस्थेमधील कर्मचारी /अधिकाऱ्यांकडून जमा केलेल्या परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या अंशदानाचा परतावा (८३४२ ०१९५ ) संस्थामधील कर्मचाऱ्यांचा जमा केलेला परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या अंशदानाचा परतावा या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

५) **देय व्याज-** (अ) मृत कर्मचाऱ्याच्या वारसास कर्मचाऱ्याच्या अंशदानाबरोबर नियोक्त्याचे अंशदान व त्यावरील व्याज देय राहील. (ब) नियत वयोमानापूर्वी निवृत्ती घेतलेल्या कर्मचाऱ्यास त्याच्या स्वताच्या अंशदानाबरोबर नियोक्त्याचे अंशदान व त्यावरील व्याज देय राहील. (क) विद्यापीठाने सक्तीने सेवानिवृत्त केलेल्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीत परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेखालील जमा रक्कमेच्या ताळमेळानंतर त्या कर्मचाऱ्यास त्याचे व नियोक्त्याचे अंशदान व त्यावरील सक्तीच्या सेवा निवृत्तीच्या तारखेच्या आदल्या दिवसांपर्यंतचे व्याज देय राहील. (ड) पूर्वीची सेवा जोडून दिलेल्या कर्मचाऱ्यास केवळ त्याचे अंशदान व त्यावरील व्याज परत मिळेल.

-----------------------------------

**नमुना-अ**

**परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत कर्मचाऱ्यांच्या लेख्यात जमा रक्कमेच्या परताव्यासंबंधी मृत कर्मचाऱ्याच्या वारसाने / सेवा समाप्त झालेल्या कर्मचाऱ्याने करावयाचा अर्ज**

वारसाचे / कर्मचाऱ्याचे नाव व पूर्ण पत्ता :
दिनांक :

प्रति,
आहरण व संवितरण अधिकारी,
कार्यालयाचे नाव व पत्ता

विषय :- परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत जमा असलेल्या रकमेच्या परताव्याबाबत.

महोदय,

१) माझे / माझी / माझा पती / पत्नी / भाऊ / बहीण / मुलगा / मुलगी / कै.श्री./ श्रीमती----------- हे / हया सेवेत दिनांक-------ते दिनांक--------कार्यरत होते / होत्या. दिनांक----------रोजी त्यांचे निधन झाले आहे. त्यामुळे त्यांची सेवा दिनांक----------पासून संपुष्टात आली आहे. सेवेत असताना ते / त्या परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना या योजनेचे सभासद होते / होत्या.
त्यांनी परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत रक्कम मिळण्यासाठी मला नामनिर्देशित केले आहे / त्यांनी परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत रक्कम मिळण्यासाठी मला नामनिर्देशित केले नाही परंतु भविष्य निर्वाह निधी नियम, १९ मधील तरतुदींच्या अनुषंगाने मी त्यांचा वारस ठरतो/ठरते. (लागू नसेल ते खोडावे) त्यामुळे त्यांच्या लेख्यात जमा असलेल्या रकमेचा परतावा मला मिळावा, ही विनंती. यासोबत मी कै.श्री/श्रीमती -------------- यांचा मृत्यूच्या दाखल्याची मूळ प्रत जोडत आहे. त्यांचेशी माझे नाते पुढीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | नांव | मयत कर्मचाऱ्याशी नाते |
|---|---|---|
| | | |

२) मी खाली सही करणार श्री/श्रीमती----------------सेवेत दिनांक-----------ते दिनांक----------
-कार्यरत होतो / होते. मी सेवेचा राजीनामा दिल्यामुळे / मला बडतर्फ करण्यात आल्यामुळे / माझी सेवा-------------
--या कारणाने संपल्याने (कारण नमूद करावे) दिनांक------------पासून संपुष्टात आली आहे. मी सेवेत असताना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना या योजनेचा सभासद होतो. माझी सेवा संपुष्टात आल्यामुळे माझ्या लेख्यात जमा असलेल्या रकमेचा परतावा मला मिळावा, ही विनंती. याबाबत आवश्यक तो तपशिल खालीलप्रमाणे देत आहे. माझ्या वेतनामधून माहे----- २०---------- मध्ये शेवटची वजाती------संस्थेमधून करण्यात आली असून सदर देयकाचा प्रमाणक क्र.--------------दिनांक------------असा आहे.

३) कर्मचाऱ्याचा आवश्यक तपशील खालीलप्रमाणे आहे :

| कर्मचाऱ्याचे नाव | लेखा क्रमांक | सेवेत रुजू झाल्याची तारीख | मृत्युच्या वेळी / सेवा समाप्तीच्या वेळी धारण केलेले पद | अर्जदाराचा/कर्मचाऱ्याचा सध्याचा पत्ता |
|---|---|---|---|---|
| | | | | |

आपला विश्वासु,

**सोबत :- मृत्युचा दाखला**
**स्थळ :-**
**दिनांक :-** ( )

## नमुना-ब

**आहरण व संवितरण अधिकाऱ्याने परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत कर्मचाऱ्याच्या लेख्यात जमा रकमेची माहिती कर्मचारी सेवासमाप्तीच्या वेळी ज्या कार्यालयात कार्यरत होता त्या नियंत्रकाकडून प्राप्त करण्याकरीता करावयाचा अर्ज.**

कार्यालयाचे नाव व पत्ता
दिनांक . .

प्रति,

कोषागार अधिकारी,
-----------------
-----------------

**विषय :-** परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत जमा असलेल्या रक्कमेच्या परताव्याकरीता लागणारे विवरणपत्र (नमुना-ई-१) पाठविण्याबाबत.

महोदय,

या कार्यालयात कार्यरत असलेले कर्मचारी श्री. / श्रीमती-----------------------यांचे दिनांक -------------- रोजी निधन झाल्यामुळे / त्यांनी दिनांक -------------- पासून सेवेचा राजीनामा दिल्यामुळे / त्यांनी दिनांक ------- पासून स्वेच्छासेवानिवृत्ती पत्करल्यामुळे / त्यांना सेवेतून दिनांक ------------- पासून बडतर्फ करण्यात आल्यामुळे/ ---------------कारणाने सेवा संपल्याने/ --------------------- (कारण नमूद करावे) या कारणामुळे त्यांची सेवा दिनांक --------------- पासून संपुष्टात आलेली आहे. सदर कर्मचारी सेवेत असताना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेचे सभासद होते. उपरोक्त कारणामुळे कर्मचाऱ्याची सेवा संपुष्टात आल्यामुळे त्यांच्या लेख्यात जमा असलेल्या रकमेचा परतावा त्यांनी नामनिर्देशित केलेल्या वारसदारास / त्यांना परत मिळण्याबाबत वारसदारांचा / त्यांचा अर्ज प्राप्त झाला आहे. त्या अनुषंगाने सदर कर्मचाऱ्याचा तपशिल खालील प्रमाणे सादर करीत आहे :

| नांव | लेखा क्रमांक | सेवेत रुजू झाल्याची तारीख | सेवा समाप्तीच्या वेळी धारण केलेले पद | सध्याचा पत्ता | सेवेत रुजू झाल्याच्या दिनांकापासून सेवा समाप्तीच्या दिनांकापर्यंतचा तपशिल दर्शवावा (आर्थिक वर्षानुरुप) | कर्मचाऱ्याने धारण केलेले पद | कार्यालयाचे नाव | संस्थेचे नाव | संबंधित संस्थेने प्रमाणित केल्याप्रमाणे या योजनेखालील वर्षवार जमा रकमा संबंधित आर्थिक वर्षातील अंतिम जमा रक्कम दर्शवावी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | | |

वरील तपशिलाप्रमाणे सदर कर्मचारी आपल्या कार्यकक्षेतील कार्यालयात कार्यतर असल्यामुळे सदर कर्मचाऱ्याच्या खाती जमा असलेल्या रकमेचे विवरणपत्र कृपया पाठवावे ही विनंती. सदर कर्मचाऱ्याच्या वेतनातून शेवटची वर्गणी माहे-----------२०------च्या वेतनामधून करण्यात आली असून सदर देयकाचा प्रमाणक क्रमांक----व दिनांक---------------आहे.

यासोबत कर्मचाऱ्याच्या अर्जाची प्रत / वारसदाराच्या अर्जाची प्रत / मृत्युच्या दाखल्याची प्रत तसेच इतर संबंधित कोषागाराकडून प्राप्त झालेल्या विवरणपत्राची (पत्रांच्या) मुळ प्रत / प्रती जोडली (ल्या) आहे.

आपला विश्वासु,

सोबत :- १) वारसदाराचा / कर्मचाऱ्याचा अर्ज.
२) मृत्युचा दाखला.
३) ताळमेळ विवरणपत्र / विवरणपत्रे (मुळ प्रत).

स्वाक्षरी
(आहरण व संवितरण अधिकारी)

## नमुना — क

**आहरण व संवितरण अधिकाऱ्याने परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत कर्मचाऱ्यांच्या लेख्यात जमा रकमेच्या परताव्यासंबंधी राज्य अभिलेख देखभाल अभिकरणास करावयाचा अर्ज**

कार्यालयाचे नांव व पत्ता
दिनांक

प्रति,

मा. उपसंचालक,
राज्य अभिलेख देखभाल अभिकरण,
५ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन,
मादाम कामा रोड, मंत्रालयासमोर,
मुंबई ४०० ०३२

विषय - परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत जमा असलेल्या रकमेच्या परताव्याबाबत

महोदय,

या कार्यालयात कार्यरत असलेले कर्मचारी श्री. / श्रीमती----------------------यांचे दिनांक -------------- रोजी निधन झाल्यामुळे / त्यांनी दिनांक -------------- पासून सेवेचा राजीनामा दिल्यामुळे / त्यांनी दिनांक ------- पासून स्वेच्छासेवानिवृत्ती पत्करल्यामुळे / त्यांना सेवेतून दिनांक ------------- पासून बडतर्फ करण्यात आल्यामुळे/ - --------------कारणाने सेवा संपल्याने/ -------------------- (कारण नमूद करावे) या कारणामुळे त्यांची सेवा दिनांक --------------- पासून संपुष्टात आलेली आहे. सदर कर्मचारी सेवेत असताना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेचे सभासद होते. उपरोक्त कारणामुळे कर्मचाऱ्याची सेवा संपुष्टात आल्यामुळे त्यांच्या लेख्यात जमा असलेल्या रकमेचा परतावा त्यांनी नामनिर्देशित केलेल्या वारसदारास / त्यांना परत मिळण्याबाबत वारसदारांचा / त्यांचा अर्ज प्राप्त झाला आहे. त्या अनुषंगाने सदर कर्मचाऱ्याचा तपशिल खालील प्रमाणे सादर करीत आहे :

| नांव | लेखा क्रमांक | सेवेत रुजू झाल्याची तारीख | सेवा समाप्तीच्या वेळी धारण केलेले पद | सेवेत रुजू झाल्याच्या दिनांकापासून सेवा समाप्तीच्या दिनांकापर्यंतचा तपशिल दर्शवावा (आर्थिक वर्षानुरुप) | पद | कर्मचारी कार्यरत असलेल्या कार्यालयाचे नाव | कोषागाराचे नांव | संबंधित कोषागाराने प्रमाणित केल्याप्रमाणे या योजनेखालील वर्षवार जमा रकमा संबंधित आर्थिक वर्षातील अंतिम जमा रक्कम दर्शवावी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | |

सदर कर्मचाऱ्यांच्या वेतनातून शेवटची वर्गणी माहे ----------- २०--- च्या वेतनामधुन करण्यात आली असून सदर देयकाचा प्रमाणक क्रमांक -------- व दिनांक ----- आहे.

यासोबत कर्मचाऱ्यांचा अर्ज /वारसाचा अर्ज /मृत्यूचा दाखला, आर्थिक वर्षाच्या नमुना आर- ३ मधील लेखा (Statement of Accounts) विवरणाची प्रत जोडण्यात येत आहे.

आपला विश्वासु,

स्वाक्षरी
(आहरण व संवितरण अधिकारी)

सोबत :- १) वारसदाराचा / कर्मचाऱ्याचा अर्ज.
२) मृत्युचा दाखला.
३) आर्थिक वर्षाच्या नमुना आर- ३ मधील विवरणाची (Statement of Accounts) प्रत

## नमुना – ड

**परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत कर्मचाऱ्यांच्या लेख्यात जमा असलेल्या रकमेच्या ताळमेळासंबंधीचे विवरणपत्र**

**(कर्मचारी शेवटी ज्या कोषागाराच्या अखत्यारितील कार्यालयांत कार्यरत होता त्या कोषागाराने द्यावयाचे विवरणपत्र)**

**(** ज्या वर्षाचे विवरणपत्र असेल त्या पूर्वीच्या वर्षातील अंतिम जमा रक्कम दर्शवावी)**

**(विविरणपत्र आर्थिक विर्षनिहाय तयार करावे)**

| | | |
|---|---|---|
| कर्मचाऱ्याचे नांव | : | |
| लेखा क्रमांक | : | |
| कार्यालयाचे नांव | : | |
| सेवा संपुष्टात आल्याचा दिनांक | : | |
| सेवा संपुष्टात आली तेव्हा धारण केलेले पद | : | |
| कोषागार कार्यालयाचे नांव | : | |
| आर्थिक वर्ष | : | |

| सेवा संपुष्टात आली त्यावेळेचा कर्मचाऱ्याच्या लेख्याचा तपशिल | | | | एकूण |
|---|---|---|---|---|
| ** कर्मचाऱ्याच्या खाती मागील वित्तीय वर्षाअखेरीस जमा असलेली रक्कम (Opening Balance) | | | | |
| कर्मचाऱ्याच्या लेख्यात चालू वित्तीय वर्षात सेवा संपुष्टात येण्याच्या तारखेपर्यत जमा झालेली रक्कम | | | | |
| महिना | कर्मचाऱ्याचे अंशदान | शासनाचे अंशदान | व्याज | |
| मार्च | | | | |
| एप्रिल | | | | |
| मे | | | | |
| जून | | | | |
| जुलै | | | | |
| ऑगस्ट | | | | |
| सप्टेंबर | | | | |
| ऑक्टोबर | | | | |
| नोव्हेंबर | | | | |
| डिसेंबर | | | | |

प्रमाणित करण्यात येते की, संबंधित कर्मचाऱ्यांच्या वैयक्तिक लेख्यात आणि ब्रॉडशिट मध्ये संबंधित वर्षात वर दर्शविल्याप्रमाणे नोंदी घेतलेल्या आहेत आणि उपरोक्त रकमेचा ताळमेळ कोषागार लेख्याशी घेतला असता उपरोक्त रकमाबरोबर असल्याचे आढळून आले आहे.

(कोषागार अधिकाऱ्यांची स्वाक्षरी)

## नमुना क्रमांक – ई

क्र. राअदेअ-२००९ /आदेश/
राज्य अभिलेख देखभाल अभिकरण,
नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना,
संचालनालय, लेखा व कोषागारे,
५ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन,
मादाम कामा रोड, मंत्रालयासमोर,
महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०० ०३२
दिनांक -

वाचा : (१) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक --------------- दिनांक
(२) ---------- या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांकडून प्राप्त झालेला दिनांक ---- रोजीचा अर्ज
(३) श्री/श्रीमती ------------ यांचा परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनखालील त्यांच्या/ मृत कर्मचाऱ्याच्या खात्यातील जमा रकमेचा परतावा मिळण्याकरीता प्राप्त झालेला दिनांक ---- रोजीचा अर्ज
(४) कोषागार अधिकारी --------------- यांचे या याजनेखालील कर्मचाऱ्यांच्या सेवासमाप्तीच्या दिनांकापर्यत जमा रकमबाबतचे विवरणपत्र (नमुना - ई)

### आदेश

उपरोक्त क्रमांक २ अन्वये -------------- यांच्याकडून प्राप्त झालेल्या अर्जासोबत श्री/श्रीमती ---------------- यांच्यावर क्रमांक ३ येथे नमूद केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने आणि क्रमांक येथील ------- कोषागार अधिकाऱ्यांच्या विवरणपत्राच्या अनुषंगाने, उपसंचालक, राज्य अभिलेख देखभाल अभिकरण हे, त्यांना संदर्भ क्रमांक १ येथील शासन आदेश क्रमांक --------------- दिनांक ------------- अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार, श्री/श्रीमती ------------------- यांच्या लेखाखाती त्यांच्या सेवासमाप्तीच्या --------- दिनांकापर्यत जमा झालेल्या एकूण रुपये ---------------- (अक्षरी रुपये ------------- ) एवढया रकमेचा परतावा श्री/श्रीमती ----------------- यांना मंजूर करीत आहेत.

उपसंचालक,
राज्य अभिलेख देखभाल अभिकरण
महाराष्ट्र राज्य, मुंबई

प्रत,

१) अधिदान व लेखा अधिकारी/ कोषागार अधिकारी -------------- यांना माहिती तथा उचित कार्यवाहीस्तव
२) ------------------ (आहरण व संवितरण अधिकारी) यांना माहिती तथा उचित कार्यवाहीस्तव
३) श्री/ श्रीमती ---------------- यांना माहितीस्तव